“महाराष्ट्र वार्षिकी” पुस्तक दरवर्षी प्रकाशित करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१८/प्र.क्र.७८/३४**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ३० जानेवारी, २०१९

वाचा:- माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र.प्रकाशने/२०१७-१८/का-३/२१९१ दि.१८ डिसेंबर, २०१७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्राची अधिकृत वस्तूनिष्ठ माहिती, उदाहरणार्थ इतिहास, भूगोल, जनजीवन, उद्योग, शिक्षण, पर्यटन, कला-संस्कृती, आरोग्य, महाराष्ट्राची पंरपरा, जिल्हे, शासनाचे विभाग, गतवर्षातील राज्य शासनाच्या संदर्भातील महत्त्वाच्या घडामोडी, भारताचे राष्ट्रपती, उपराष्ट्रपती, पंतप्रधान, मंत्रीमंडळ निर्णय, केंद्राचे व महाराष्ट्राचे मंत्रीमंडळ, महाराष्ट्र विधीमंडळ, सदस्य, संसद सदस्य आदीची माहिती समाविष्ट असणारे महाराष्ट्र वार्षिकी हे पुस्तक प्रकाशित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्राची अधिकृत वस्तूनिष्ठ माहिती, उदाहरणार्थ इतिहास, भूगोल, जनजीवन, उद्योग, शिक्षण, पर्यटन, कला-संस्कृती, आरोग्य, महाराष्ट्राची पंरपरा, जिल्हे, शासनाचे विभाग, गतवर्षातील राज्य शासनाच्या संदर्भातील महत्त्वाच्या घडामोडी, भारताचे राष्ट्रपती, उपराष्ट्रपती, पंतप्रधान, मंत्रीमंडळ निर्णय, केंद्राचे व महाराष्ट्राचे मंत्रीमंडळ, महाराष्ट्र विधीमंडळ, सदस्य, संसद सदस्य आदीची माहिती समाविष्ट असणारे "महाराष्ट्र वार्षिकी" हे पुस्तक दरवर्षी प्रकाशित करुन त्याची विक्री करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर पुस्तकाची छपाई शासकीय मुद्रणालयाकडून करण्यात यावी.
२. शासकीय मुद्रणालयामधून सदर पुस्तकाची छपाई करणे शक्य नसल्यास खाजगी मुद्रणालयाकडून छापून घेण्यासाठी शासकीय मुद्रणालयाचे "ना हरकत प्रमाणपत्र" घेऊन विहित कार्यपध्दतीचा अवलंब करावा.
३. सदर पुस्तकाची विक्री किंमत शासनाचे प्रचलित नियम व अटी विचारात घेऊन वाजवी ठरविण्यात यावी.
४. या पुस्तकाच्या प्रतींची विक्री मुख्यालय तसेच महासंचालनालयाच्या अधिनस्त असलेली जिल्हा माहिती कार्यालये व लोकराज्य विक्रेते, शासकीय मुद्रणालय इ. शासकीय यंत्रणेमार्फतच करण्यांत यावी. खाजगी संस्था अथवा व्यक्ती यांच्यामार्फत विक्री करण्यात येऊ नये.
५. महाराष्ट्र वार्षिकी अंकाच्या विक्रीने शासनाच्या खाती रक्कम जमा झाली त्याचा तपशिल दरवर्षी शासनास सादर करावा.

६. सदर पुस्तक मराठी व इंग्रजी मध्येच छापण्यांत यावे, अन्य भाषेत छापण्याचे झाल्यास सबळ कारणांसह त्यास शासनाची मंजूरी घ्यावी.

७. महाराष्ट्र वार्षिकी (मराठी व इंग्रजी) हे पुस्तक दरवर्षी छपाईकरण्यापूर्वी शासनाची प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

२. प्रस्तुतचा खर्च सामान्य प्रशासन विभाग क्र. ए-६-२२२० ,माहिती व प्रसिद्धी-०१, चित्रपट-००१, संचालन व प्रशासन, (००) (०१) प्रसिद्धी संचालक, १६ प्रकाशने संगणक संकेतांक (२२२०००४३) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४७२/२०१८/व्यय-४ दि.२१ डिसेंबर, २०१८ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३०१७०७३४९७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2019.01.30 17:22:22 +05'30'

**(रा. ना. मुसळे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२. सर्व विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य
३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
४. महालेखापाल१/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
८. संचालक(माहिती) (प्रशासन) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
९. मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
१०.मा.राज्यमंत्री(मा.व ज.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११.उप संचालक(लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२. लेखाधिकारी (आहरण व संवितरण) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१३. सर्व मंत्रालयीन विभाग
१४. निवड धारिका/ कार्यासन ३४